**सन २०२४-२५ करिता अर्थसंकल्पिय**
**तरतूदीतून निधीचे वितरण**
**राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१७२४/प्र.क्र.२७९/मातं**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १२ फेब्रुवारी, २०२५

**शासन निर्णय :-**

राज्यातील विविध सामाजिक प्रश्नांमध्ये समाजाच्या हितासाठी विज्ञान व तंत्रज्ञानाचा अवलंब करणे, त्याचा प्रसार करणे आणि त्यास चालना देणे या उद्देशाने सन २००४ च्या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १५ अन्वये राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगाची स्थापना करण्यात आली आहे. उपरोक्त अधिनियमातील नियम क्रमांक १४ अनुसार राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगाकरिता शासनाच्या एकत्रित निधीतून अनुदानाच्या स्वरुपात प्रत्येक आर्थिक वर्षामध्ये निधी अदा करण्यात येतो.

०२. राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगासाठी सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी रु.५२.५० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला असून, त्यापैकी रु.५० कोटी इतका निधी ३६-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) व रु.०२.५० कोटी इतका निधी ३६-सहायक अनुदाने (वेतन) या तपशिलवार लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आला आहे.

सद्यस्थितीत राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग यांनी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये ६०% (रु.३०,००,००,०००/-) निधी वितरीत करण्याबाबत शासनास विनंती केलेली असून, यापूर्वी आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये वितरीत ४०% म्हणजेच रु.३६,८०,००,०००/- निधीच्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर केलेली आहेत. तद्नूषंगाने, नियोजन व वित्त विभागास ६० टक्के निधी वितरित व खर्च करण्यास मंजूरी देण्याची विनंती करण्यात आलेली होती. त्यानुसार नियोजन व वित्त विभागाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात, मागणी क्रमांक ए-५, "विज्ञान व तंत्रज्ञान यामध्ये समन्वय व संशोधन (कार्यक्रम) (२२५१००४२), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दिष्टांसाठी मंजूर अर्थसंकल्पित तरतूदीपैकी वितरीत तरतूदी व्यतिरिक्त वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.२५.०७.२०२४ नुसार रु.२० कोटी (४० टक्के) इतका निधी वितरित करण्याबाबत मंजूरी दिली आहे.

०३. सबब, राजीव गांधी विज्ञान तंत्रज्ञान आयोगास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये सुधारित अंदाजाच्या मर्यादेत ४०% म्हणजेच रु.२०,००,००,०००/- इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. कक्ष अधिकारी, विज्ञान व तंत्रज्ञान कक्ष यांनी रु.२०,००,००,०००/- (रुपये वीस कोटी फक्त) या रकमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयाकडे सादर करुन मंजूर करुन घ्यावे व सदर रक्कम सदस्य सचिव, राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग यांना सुपूर्द करण्यात यावी.

**०४.** सदर अनुदानाच्या रकमेचा विनियोग सन २००४ च्या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १५ मधील नमूद प्रयोजनासाठीच करण्यात यावा तसेच त्यामधून खर्च करताना वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. सदर निधी/अनुदान पुढील अटी-शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

i. आयोगाने ज्या प्रकल्प/कार्यक्रम/योजनांवर निधी खर्च केला आहे, त्याबाबत प्रधान सचिव (मातं) यांना दरमाह प्रकल्पनिहाय सादरीकरण (Presentation) करावे.

ii. आयोगाने यापूर्वी ज्या प्रकल्प/कार्यक्रम/योजनांवर निधी खर्च केला आहे अशा प्रकल्प/कार्यक्रमांचे परिणाम (Result/Output) काय झाले त्याबाबतही सादरीकरण (Presentation) करावे.

iii. आयोगाच्या निधीतून केलेल्या संशोधनाचा नागरीकांना काय फायदा झाला याबाबत वेळोवेळी प्रधान सचिव (मातं) यांना अहवाल सादर करण्यात यावा.

iv. आयोगास या आर्थिक वर्षामध्ये मंजूर झालेल्या निधीतून हाती घेण्यात येणारे प्रकल्प/कार्यक्रम/योजना याबाबत वार्षिक आराखडा प्रधान सचिव (मातं) यांना सादर करण्यात यावा.

v. राजीव गांधी व विज्ञान तंत्रज्ञान आयोगाने खर्च केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) सादर करावे. उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) सादर केल्यावरच पुढील निधी वितरीत करण्यात येईल.

**०५.** वरील खर्च मागणी क्रमांक ए-५, मुख्यलेखाशिर्ष २२५१ सचिवालयीन-सामाजिक सेवा, ०९० सचिवालय, (००)(०३) विज्ञान व तंत्रज्ञान यामध्ये समन्वय व संशोधन (कार्यक्रम) (२२५१ ००४२), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.५५५/का.१४४३, दि.०३.१२.२०२४ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.४२/व्यय-४, दि.२८.०१.२०२५ अन्वये सदर खर्चास दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१२११४०१४९८०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDAM EKNATH ANDHALE

Digitally signed by SUDAM EKNATH ANDHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=257966df2620df1403d35023802519a4fbdcfcd894791eba41c2aef2b4c4b975, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B57FEE59F0E7101B822A49C72629C21BF9B4DC0BDE136817EE19B6B347E77F4, cn=SUDAM EKNATH ANDHALE
Date: 2025.02.12 11:41:29 +05'30'

**( सुदाम आंधळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५) सदस्य सचिव, राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग, मंत्रालय, मुंबई
६) नियोजन विभाग (कार्यासन १४४३), मंत्रालय, मुंबई
७) वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई
८) सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन ३९ (रोखशाखा) तीन प्रती.
९) निवडनस्ती.